साथरोग नियंत्रण कार्यक्रम (लेखाशिर्ष २२१०४२८६) अंतर्गत सन २०२१-२२ च्या पुरवणी मागणी अनुदानातून कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या Ivlg (for MSI C) च्या खरेदीसाठी सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८**

१० वा मजला, गो. ते. रूग्णालय संकूल इमारत,
नवीन मंत्रालय, मुंबई - ४००००१.
दिनांक : ०१ नाव्हेंबर, २०२१

वाचा :-

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. क्रमांकः प्रशामा-१२२१/प्र.क्र.१४२/आरोग्य-८ , दि.१३.०७.२०२१
२) संचालक,आरोग्य सेवा,पुणे यांचे पत्र क्र.संआसे/कोविड-१९/नियंत्रण कक्ष,पुणे/औषध खरेदीस सुधारीत प्रशासकीय मान्यता मिळण्याबाबत/२२३८२-८३/२०२१ दि.२१.०९.२०२१ व दि. ११.१०.२०२१
३) आयुक्त (आरोग्य सेवा) तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई यांच्याकडील दिनांक २१.०९.२०२१ रोजीची मान्य टिप्पणी.

प्रस्तावना:-

संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी दिनांक ११.१०.२०२१ रोजीच्या पत्रान्वये प्रस्तावित केल्यानुसार, कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या Ivlg (for MSI C) या औषधाची खरेदी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत मंजुर करण्यात आलेल्या पुरवणी मागणीतील अनुदानाच्या मर्यादेतच करण्यासाठी अंदाजित रु. २१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकविस कोटी फक्त ) इतक्या रकमेस सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

शासन निर्णय :-

संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, कोवीड-१९ या साथरोगावरील उपचारासाठी आवश्यक असणा-या Ivlg (for MSI C) औषधाची खरेदी करण्यासाठी प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. संचालक, आरोग्य सेवा,पुणे कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक २१.०९.२०२१, व दि.११.१०.२०२१ रोजीच्या पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावानुसार हाफकीन महामंडळाच्या खरेदी कक्षाकडील प्रत्यक्ष निविदा प्रक्रीया अंती प्राप्त झालेल्या दरानुसार सदर औषधांची अंदाजित रु. २१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकविस कोटी फक्त ) इतक्या रकमेची खरेदी करण्यास सुधारीत प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खरेदी साठी येणारा खर्च अंदाजित रुपये २१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकविस कोटी फक्त )सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत

उपलब्ध असलेल्या पुरवणी मागणी अनुदानातुन हाफकिन खरेदी कक्षाकडे वर्ग केलेल्या रकमेतुन भागविण्यात येणार आहे. त्यास अनुसरून खालील तक्त्यात नमुद केल्यानुसार Ivlg (for MSI C) औषधाची खरेदीसाठीच्या सुधारित प्रशासकीय मान्यतेसाठीचे विवरणपत्र खालीलप्रमाणे आहे :-

## अनुदान/ खरेदीचा तपशिल

| Sr. No | Name of Item | Approx. Rate per Unit (Rs.) | Approx. Quantity to be Procured (Nos.) | Approx.Amount of Procured (Rs.) | Rate received thro E – Tender@ HBPCL (Rs.) | Actual Amount Required as per E-Tender Rate (Rs.) | Budget Source |
|---|---|---|---|---|---|---|---|
| 1 | **IvIg (for MSI - C)** | **6000/-** | **25000** | **15,00,00,000/-** | **8400/-** | **21,00,00,000/-** | **Epidemic Control Programme 22104286 (Proposed Supp. Demand 2021-22)** |

**०३.** वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने कोविड १९- ची संभाव्य लाट विचारात घेवून उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता राज्यात उद्भवलेल्या कोवीड-१९ च्या अनुषंगाने Ivlg (for MSI C) औषधाच्या खरेदीस सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या प्रस्तावासाठी सादर करावयाची प्रमाणपत्रे (परिशिष्ट-अ) व विनियोग प्रमाणपत्र संचालक, आरोग्य सेवा,पुणे कार्यालय यांनी त्यांच्या दिनांक २१.०९.२०२१ रोजीच्या प्रस्तावानुसार प्रमाणित केलेले आहे.

**०४.** कोविड १९- ची संभाव्य लाट विचारात घेवून उपचारात्मक व प्रतिबंधात्मक उपायोजनांकरिता कोवीड-१९ च्या अनुषंगाने आवश्यक Ivlg (for MSI C) औषधाच्या खरेदी करण्यासाठी अंदाजित रुपये २१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकविस कोटी फक्त ) इतक्या रकमेच्या खरेदी करण्याच्या प्रस्तावास आयुक्त, आरोग्य सेवा, आयुक्तालय,मुंबई यांनी त्यांच्या दिनांक २१.०९.२०२१ रोजीच्या टिप्पणीद्वारे मान्यता दिली आहे.

**०५.** संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी प्रस्तावित केल्यानुसार, राज्यातील आरोग्य संस्थांना सन २०२१-२२ च्या पुरवणी मागणी अनुदानातून कोविड १९ प्रतिबंधात्मक उपाययोजनांकरीता आवश्यक असलेल्या Ivlg (for MSI C) औषधाच्या खरेदी उपलब्ध असलेल्या अनुदानाच्या मर्यादेतच करण्यात यावी. संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे यांच्या दि. २१.०९.२०२१ व दि. ११.१०.२०२१ च्या प्रस्तावानुसार सादर करण्यात आलेल्या प्रमाणपत्र (परिशिष्ट-अ) मध्ये नमुद केलेल्या सदर खरेदी साठी येणारा खर्च अंदाजित रुपये २१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एकविस कोटी फक्त ) सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात साथरोग नियंत्रण कार्यक्रम लेखाशिर्ष २२१०४२८६ अंतर्गत उपलब्ध असलेल्या पुरवणी मागणी अनुदानातुन भागविण्यात यावा. शासन निर्णय दिनांक १३.०७.२०२१ मधील अटींच्या अधीन राहुन सुधारित प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

**०६.** शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/१३/विनियम, भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ भाग-पहिला उपविभाग-दोन मधील अनु क्रमांक ४, नियम क्र. ७ अन्वये अवजारे, किरकोळ साधन सामग्री आणि उपक्रम संच विकत घेण्यास

मंजूरी देण्यासाठी प्रशासनिक विभागास पूर्ण अधिकार प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार सदर प्रस्तावास मान्यता देण्यात येत आहे.

०७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२११३२०७६९१७ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VASANT PANDURANG GAIKWAD

Digitally signed by VASANT PANDURANG GAIKWAD
Date: 2021.11.01 13:04:52 +05'30'

( व.पां.गायकवाड)
अवर सचिव महाराष्ट्र शासन

प्रत:-

१) आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
२) व्यवस्थापकिय संचालक, हाफकिन बायो-फार्मास्युटीकल्स कॉर्पोरेशन लि.परेल,मुंबई
३) संचालक, आरोग्य सेवा, आरोग्य संचालनालय, मुंबई,पुणे.
४) सह संचालक,आरोग्य सेवा,रुग्णालये (राज्यस्तर),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
५) सह संचालक, आरोग्य सेवा, (खरेदी कक्ष),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
६) सह संचालक आरोग्य सेवा, (अर्थ व प्रशासन),आरोग्य सेवा संचालनालय मुंबई
७) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),मुंबई
८) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखापरिक्षा/लेखा अनुज्ञेयता),नागपूर
९) अधिदान व लेखाधिकारी,मुंबई
१०) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,मुंबई
११) अधिक्षक, विभागीय संदर्भ सेवा रुग्णालय, अमरावती/नाशिक
१२) निवडनस्ती (आरोग्य-८)